विभागीय चौकशी अधिकारी-२ यांच्याकडे विभागीय चौकशीचे प्रस्ताव सादर करण्याबाबत मार्गदर्शक सूचना

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्र. विभाचौ १११११/(९/११)/साअ-२
मंत्रालय, मुंबई
दिनांक १ जुलै, २०११

संदर्भ:- १) सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र. सीडीआर १६९१/प्र.क्र. १४९-९१/११-अ, दिनांक ५.१.९३

२) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्र.संकीर्ण १९९६/प्र.क्र.२/९५/१०-अ, दिनांक १८ मे, १९९६.

३) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्र. सीडीआर १००९/प्र.क्र. ५०/९/११, दिनांक १३ मे, २०१०

परिपत्रक:-

राज्य सेवेतील वरिष्ठ अधिका-यांच्या विभागीय चौकशी प्रकरणांसाठी संदर्भाधीन दिनांक १८ मे, १९९६ च्या परिपत्रकानुसार राज्यसेवेतील अतिरिक्त जिल्हाधिकारी, सहसंचालक, अतिरिक्त संचालक, संचालक, अधिक्षक अभियंता, मुख्य अभियंता, उपसचिव, सहसचिव, विभागप्रमुख किंवा या संवर्गाशी समकक्ष किंवा वरिष्ठ असलेल्या इतर संवर्गातील अधिका-याविरुध्दची विभागीय चौकशीची प्रकरणे विशेष चौकशी अधिकारी - २ यांच्याकडे सोपविण्यात आली आहेत.

विभागीय चौकशी प्रकरणे विनाविलंब निकाली काढण्यासाठी संदर्भाधीन दिनांक १३ मे, २०१० च्या परिपत्रकानुसार आवश्यक सूचना देण्यात आल्या आहेत. तथापि, प्रशासकीय विभाग चौकशी अधिकारी यांना विहित नमुन्यात प्रस्ताव सादर करत नसल्यामुळे प्रकरणे अनावश्यक प्रलंबित राहत आहेत. संदर्भाधीन दिनांक १३ मे, २०१० अन्वये दिलेल्या सूचना तसेच प्रत्यक्ष चौकशी करताना उदभवणा-या समस्या यांचा एकत्रित विचार करुन खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना तयार करण्यात आल्या आहेत.

१) प्रस्ताव सादर करताना खालीलप्रमाणे अनुक्रमणिका करुन कागदपत्रे जोडण्यात यावीत.

| अ.क्र. | कागदपत्र | पृष्ट क्रमांक |
|---|---|---|
| १ | चौकशी अधिकारी/सादरकर्ता अधिकारी यांच्या नियुक्तीचे आदेश | |
| २ | दोषारोपाचे ज्ञापन (जोडपत्र १ ते ४) | |

| | | |
|---|---|---|
| ३ | सामाईक कारवाई असेल तर नियम १२ खालील आदेश | |
| ४ | जोडपत्र-४ मधील कागदपत्राचे सुस्पष्ट व साक्षांकित संच | |
| ५ | अपचारी तथा जोडपत्र-३ मधील साक्षीदारांचे अद्ययावत पत्ते, दूरध्वनी/भ्रमणध्वनी क्रमांक अथवा सेवानिवृत्त असल्यास त्याच्या घरचा अद्ययावत पत्ता, दूरध्वनी/भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६ | अपचा-याने दोषारोप पत्रास अनुसरुन केलेले निवेदन असल्यास त्याची प्रत, नसल्यास, तसे नमूद करावे | |
| ७ | जोडपत्र-४ मधील दस्तऐवज व जोडपत्र-३ मधील साक्षीदार कोणत्या दोषारोपाशी संबंधित आहेत त्यांचे खालील नमुन्यार्तगत विवरणपत्र | |

| | दोषारोप क्रमांक | संबंधित दस्तऐवज | संबंधित साक्षीदार | |
|---|---|---|---|---|
| | | | | |

२) विभागीय नियम पुस्तिका, १९९१ (नियम क्र. ६.६) मधील खालील तरतुद पहावी. प्राथमिक चौकशीच्या वेळी अनेक साक्षीदारांची तपासणी करुन त्यांच्या जबाबाची नोंद घेण्यात येते. अशा साक्षीदारांच्या यादीची काळजीपूर्वक तपासणी करण्यात येऊन जे साक्षीदार आरोप साधार असल्याबद्दल निश्चित पुरावा देऊ शकतील, अशाच साक्षीदारांना प्रत्यक्ष चौकशीच्या वेळी साक्ष देण्याच्या दृष्टीने यादीमध्ये समाविष्ट करण्यात यावे.
वरील तरतूद लक्षात घेता, जर एखाद्या प्रकरणात साक्षीदार नसतील किंवा प्राथमिक चौकशी केली नसेल तर दोषारोप कशाच्या आधारे ठेवण्यात आले आहेत हे स्पष्ट करावे.

३) प्रशासकीय विभागाने दोषारोपात नमूद केलेल्या प्रत्येक कागदपत्राची साक्षांकित प्रत अपचा-याला दोषारोप पत्र बजावताना उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. तसेच सदर सर्व कागदपत्रे चौकशी अधिका-यांना उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. (जोडपत्र-४ मध्ये नमूद केलेल्या कागदपत्राव्यतिरीक्त) (विभागीय चौकशी नियम पुस्तिका, १९९१, नियम ६.७, ६.९ व ६.१४ पहावा)

४) जोडपत्र ४ मध्ये नमूद केलेले कागदपत्रांना योग्यरित्या चिन्हांकित करण्यात यावे. (जोडपत्र ४ मध्ये नमूद केलेल्या कागदपत्रांना पी-१,पी-२ -- या प्रमाणे क्रमांक देण्यात यावेत. (विभागीय नियमपुस्तिका ६.१६ (२) कृपया पहावा.)

५) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक, दिनांक ५.१.१९९३ नुसार नेमलेल्या सनियंत्रण अधिका-याच्या नेमणुकीचे आदेश, समन्वय अधिका-याचा पत्ता व दूरध्वनी/भ्रमणध्वनी क्रमांक याचा तपशिल देण्यात यावा.

६) चौकशी अधिकारी/सादरकर्ता अधिकारी यांच्या नेमणुकीचे आदेश जोडतानाच वरीलप्रमाणे सर्व कागदपत्रे जोडावीत.

७) अपचारी /साक्षीदार यांच्या पत्त्यांत बदल झाल्यास त्याबाबत चौकशी अधिकारी यांना अवगत करण्याबाबत संबंधितांना वेळोवेळी सूचना देण्यात याव्यात.

८) वर्ग-१ च्या विभागीय चौकशी प्रकरणात शासन सक्षम प्राधिकरण असल्याने संबंधित प्रशासकीय मंत्रालयीन विभागानी प्रस्तावाबाबत वेळोवेळी लागणारी माहिती चौकशी अधिकारी यांना उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

९) दोषारोप पत्र व जोडपत्र-४ मधील साक्षांकित कागदपत्रांचे तीन संच देण्यात यावेत.

१०) वरील सूचनांबाबत काही शंका असल्यास प्रशासकीय विभागाच्या सनियंत्रण अधिका-यांनी या कार्यासनाशी संपर्क साधावा

वरील सूचनांनुसार प्रस्ताव प्राप्त न झाल्यास प्रस्ताव प्रशासकीय विभागांना परत पाठविण्यात येतील व याबाबतची संपूर्ण जबाबदारी प्रशासकीय विभागाची राहील.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०७०११६४२०९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सि. मं. इनामदार )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
अमुस/प्रस/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व मंत्रालयीन विभाग (संबंधीत आस्थापना विभाग)
निवडनस्ती

D:\Sanjay Pol\Sankirn.doc